कार्यालयीन तपासणीचे प्रमाणकांबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- PWD ६५०१३/ प्र.क्र.३२ / २०१९/ मिव्य-३**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक - २० मार्च, २०२०

वाचा- सा.बां.वि. शा.नि.क्र. आयएनएस-१०९०/ सीआर -१२/ मिव्य-३, दि. २५.६.१९९३

**प्रस्तावना-**

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील १३ क्षेत्रिय कार्यालयांची तपासणी महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमावली १९८४ (६ वी आवृत्ती ) मधील परिच्छेद २६ येथील तरतुदी तसेच मुख्य अभियंता समितीने केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात आलेल्या क्र.आयएनएस-१०९०/ सीआर-१२ / मिव्य-३ ,दि.२५.६.१९९३ च्या शासन निर्णयानुसार करण्यात येते. सदरील शासन निर्णयास २५ वर्षापेक्षा अधिक कालावधी झाला असून दरम्यानच्या काळात दि. १ जानेवारी, २०१५ पासून भारतीय प्रशासकीय सेवा ( IAS ) दर्जाच्या अधिकाऱ्याची सार्वजनिक बांधकाम विभागाचे विभागप्रमुख म्हणून नियुक्ती झालेली आहे. त्यामुळे कार्यालयीन तपासणीच्या प्रमाणकांमध्ये सुधारणा आवश्यक आहे किंवा कसे, यासंदर्भात सर्व मुख्य अभियंता यांचेकडून अभिप्राय मागविण्यात आले होते. त्याअनुषंगाने सर्व मुख्य अभियंता यांचेकडून प्राप्त झालेले अभिप्राय विचारात घेऊन कार्यालयीन तपासणीच्या प्रमाणकातील दिनांक २५.६.१९९३ च्या शासन निर्णयात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमावली १९८४ ( ६ वी आवृत्ती ) मधील परिच्छेद २६ अन्वये तसेच दिनांक २५.६.१९९३ रोजीच्या शासन निर्णयानुसार, सार्वजनिक बांधकाम विभागातील क्षेत्रिय कार्यालयांची तपासणी कोणी व केंव्हा करावी याबाबत सूचना दिलेल्या आहेत.

२. उपरोल्लिखित दिनांक २५.६.१९९३ रोजीचा शासन निर्णय या शासन निर्णयान्वये अधिक्रमित करण्यात येत असून कार्यालयीन तपासणीच्या प्रमाणकांसंदर्भात सर्व मुख्य अभियंता कार्यालयांकडून प्राप्त झालेल्या शिफारशी / अभिप्राय विचारात घेऊन कार्यालयीन तपासणीच्या प्रमाणकांबाबत खालीलप्रमाणे सुधारणा करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे:-

| अ.क्र. | तपासणी अधिकारी | तपासणी करण्यात येणारी कार्यालये ( महसुली प्रादेशिक विभाग ) | तपासणीचा कालावधी |
|---|---|---|---|
| १ | सचिव (रस्ते ) व सचिव (बांधकामे) (आळीपाळीने) | १) सर्व मुख्य अभियंता, सा.बां. प्रादेशिक विभाग व एक मंडळ कार्यालय. | प्रत्येक वर्षी |
| | | २) मुख्य अभियंता ( विद्युत ) सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई | |

| | | | |
|---|---|---|---|
| | | ३) मुख्य अभियंता ( राष्ट्रीय महामार्ग ) सार्वजनिक बांधकाम विभाग, नवी मुंबई | |
| | | ४)मुख्य वास्तुशास्त्रज्ञ,महाराष्ट्र राज्य मुंबई | |
| | | ५) मुख्य अभियंता व प्रकल्प संचालक ADB ( Asian Development Bank) | |
| २ | मुख्य अभियंता व सह सचिव | अ)संचालक,उपवने व उद्याने, मुंबई<br>ब) अधीक्षक अभियंता (यांत्रिकी ) सार्वजनिक बांधकाम विभाग, नवी मुंबई<br>क)अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ, सार्वजनिक बांधकाम विभाग, नवी मुंबई | प्रत्येक वर्षी |
| ३ | मुख्य अभियंता | अ)त्यांचे अधिपत्याखालील सर्व मंडळ कार्यालये<br>ब) त्यांचे अधिपत्याखालील प्रत्येक मंडळातील १ विभाग<br>क) जिल्हा परिषदेकडील १ विभाग | प्रत्येक वर्षी |
| ४ | अधीक्षक अभियंता | अ) त्यांचे अधिपत्याखालील सर्व विभागीय कार्यालये ( जिल्हा परिषदेकडील विभागासह ) (मुख्य अभियंता यांनी तपासणी केलेली विभागीय कार्यालये वगळून )<br>ब) १ उप विभाग कार्यालय ( सर्व विभाग कार्यालये व जि. प. विभाग कार्यालयातील १ उप विभाग कार्यालय ) | प्रत्येक वर्षी |
| ५ | कार्यकारी अभियंता | सर्व उप विभागीय कार्यालये, ( अधीक्षक अभियंता यांनी तपासणी केलेली उप विभाग कार्यालये वगळून ) | प्रत्येक वर्षी |
| ६ | मुख्य अभियंता, विद्युत | अ) सर्व सा. बां. (विद्युत ) मंडळ कार्यालये<br>ब) सर्व सा. बां. (विद्युत ) मंडळ कार्यालयाच्या अधिपत्याखालील १ विद्युत विभाग कार्यालय व १ विद्युत निरीक्षण कार्यालय | प्रत्येक वर्षी |
| ७ | अधीक्षक अभियंता (विद्युत ) | अ) त्यांचे अधिपत्याखालील सर्व सा. बां. (विद्युत ) विभाग व सर्व विद्युत निरीक्षण विभाग कार्यालये, मुख्य अभियंता (विद्युत) सा.बां. विभाग यांनी तपासणी केलेली कार्यालये वगळून ) | प्रत्येक वर्षी |

| | | | |
|---|---|---|---|
| | | ब) त्यांचे अधिपत्याखालील सर्व विभागातील १ उप विभाग कार्यालय व १ विद्युत निरीक्षण उपविभाग | |
| ८ | कार्यकारी अभियंता | त्यांचे अधिपत्याखालील सर्व सा. बां. (विद्युत) उप विभागीय कार्यालये व विद्युत निरीक्षण उप विभाग कार्यालये. (अधीक्षक अभियंता (विद्युत) यानी तपासणी केलेले उपविभाग कार्यालये वगळून) | प्रत्येक वर्षी |
| ९ | मुख्य वास्तुशास्त्रज्ञ | सर्व उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांचे कार्यालय | प्रत्येक वर्षी |
| १० | अधीक्षक अभियंता ( इमारत / पूल) संकल्प चित्र मंडळ | त्यांच्या अधिपत्याखालील सर्व सा. बां. विभाग (इमारत/पूल) संकल्प चित्र मंडळ कार्यालये | प्रत्येक वर्षी |
| ११ | अधीक्षक अभियंता (यांत्रिकी) | सर्व उप विभाग ( उप विभागापैकी ११ प्रथमवर्षी व ११ द्वितीय वर्षात ) | २ वर्षातून एकदा ( २२ उपविभाग असल्याने) |
| १२ | संचालक, उपवने व उद्याने | सर्व उप विभाग | प्रत्येक वर्षी |

३. उपरोक्त तक्त्यात नमूद केल्यानुसार कार्यालयीन तपासणी झाल्यानंतर सचिव (रस्ते) व सचिव (बांधकामे) यांचेसह विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव (सा.बां.वि.) हे देखील आवश्यकतेनुसार अहवाल वाचनाच्या वेळी क्षेत्रिय कार्यालयांना भेट देतील.

४. वरील सूचनेप्रमाणे सर्व स्तरावर कार्यालयांची नियमित तपासणी तसेच अहवाल वाचनाच्या अनुषंगाने त्यासंदर्भातील अनुपालन अहवाल वेळोवेळी उपलब्ध करण्यात येत असल्याबाबत सर्व संबंधित कार्यालयांच्या विभागप्रमुखांनी दक्षता घ्यावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००३२०१२१२३४५५१८ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

JAHANGIR KYAMUDDIN KHAN

Digitally signed by JAHANGIR KYAMUDDIN KHAN
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=0514d0441bc151d360aa9723b622b5ac853f58450638828ec27f54c83e1c36e9, postalCode=400032, street=PUBLIC WORK DEPARTMENT,MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=d8df82ccd86411440f872e806944c68d20b4533d6c7d7079d601d1337f7e8b66, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=JAHANGIR KYAMUDDIN KHAN
Date: 2020.03.20 12:15:42 +05'30'

( जहांगीर खान )

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
२. सचिव ( रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सचिव ( बांधकामे ), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई

४. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग
५. मुख्य अभियंता ( विद्युत ) सा. बां. विभाग, मुंबई
६. मुख्य अभियंता व प्रकल्प संचालक ADB ( Asian Development Bank), मुंबई
७. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. संचालक, उपवने व उद्याने, मुंबई
९. अधीक्षक अभियंता, संकल्प चित्र मंडळ, कोकण भवन, नवी मुंबई
१०. अधीक्षक अभियंता ( यांत्रिकी ), कोकण भवन, नवी मुंबई
११. निवड नस्ती ( मिव्य ३).